**परिवहन आयुक्त कार्यालयात कार्यरत असलेल्या मे. के.पी.एम.जी. प्रा.लि. या संस्थेच्या तांत्रिक सल्लागारांना मानधन अदा करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-०५१८/प्र.क.१०९/परि-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १९जानेवारी २०१९

वाचा :

१) **शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-१२१२/प्र.क्र.७४/परि-४, दि.०१.०१.२०१६ व दि.३०.१२.२०१६**
२) **परिवहन आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र. पआका/पुरवणी मागणी/का-१५/२०१८-१९/ जा.क्र .१४८३६, दि.१७.१०.२०१८**
३) **परिवहन आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र. पआका/का११/संगणक/आयटी सल्लागार/२०१८ जा.क्र.१५११५, दि.१४.१०.२०१८**
४) **वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८**
५) **वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पूरक-२०१८/प्र.क्र.१३५/अर्थ-३, दि.०५.१२.२०१८**

प्रस्तावना :

संगणकीकरणाच्या विविध योजनांच्या अंमलबजावणीकरिता मोटार वाहन विभागामध्ये मे. के. पी. एम. जी. प्रा. लि. मुंबई या संस्थेच्या १ वरिष्ठ व २ कनिष्ठ तांत्रिक सल्लागारांची संदर्भ क्र.१ वरील दि. ०१.०१.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये नियुक्ती करण्यात आली आहे. तसेच या सल्लागारांव्यतिरीक्त १ वरिष्ठ व ३ कनिष्ठ तांत्रिक सल्लागार यांची संदर्भ क्र.१ वरील दि. ३०.१२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये नियुक्ती करण्यात आली आहे. परिवहन आयुक्त कार्यालयातील सदर २ वरिष्ठ व ५ कनिष्ठ तांत्रिक सल्लागार यांना वेळोवेळी मुदवाढ देण्यात आली आहे. सदर तांत्रिक सल्लागारांना माहे ऑगस्ट २०१८ ते माहे फेब्रुवारी २०१९ या कालावधीतील मानधन अदा करण्यासाठी "मागणी क्र. बी-४ विक्रेय वस्तु व सेवा यावरील इतर कर व शुल्क, (००) (०१) परिवहन आयुक्त यांचे कार्यालय (२०४५ ००१९) २८-व्यावसायीक सेवा" या लेखाशिर्षांतर्गत पुरवणी मागणी प्रस्ताव नोव्हेंबर २०१८ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये सादर करण्यात आला होता. महाराष्ट्र (तृतीय पुरवणी ) विनियोजन अधिनियम २०१८ (सन २०१८ चा महाराष्ट्र अधिनियम क्र-६३) म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण, भाग-४, दि.०३.१२.२०१८ मध्ये प्रसिद्ध झाला असून त्यानुषंगाने निधी वितरणाबाबत आवश्यक कार्यवाही करण्याच्या सूचना वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. ५वरील दि.०५.१२.२०१८च्या शासन परिपत्रकानुसार देण्यात आल्या आहेत. त्यानुसार पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेला निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

परिवहन आयुक्त कार्यालयात कार्यरत असलेल्या मे. के. पी. एम. जी. प्रा. लि. मुंबई या संस्थेच्या २ वरिष्ठ व ५ कनिष्ठ तांत्रिक सल्लागारांचे माहे ऑगस्ट२०१८ ते माहे फेब्रुवारी २०१९ याकालावधीतील मानधन अदा करण्यासाठी रु.१,३५,२६०००/- (रुपये एक कोटी पस्तीस लाख सव्वीस हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी येणारा खर्च "मागणी क्र. बी-४ विक्रेय वस्तु व सेवा यावरील इतर कर व शुल्क, (००) (०१) परिवहन आयुक्त यांचे कार्यालय (२०४५ ००१९) २८-व्यावसायीक सेवा" या लेखाशीर्षांतर्गत उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

३. उपरोक्त मंजूर करण्यात आलेले अनुदान ते ज्या बाबींसाठी खर्च करण्यास मंजूरी देण्यात आली आहे, त्याच बाबींसाठी खर्च करावे व त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३/२०१९/व्यय-८, दि.०५.०१.२०१९ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११९१४५७५९९६२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=cf316337e92d3c54da432222208093bfc6ed1d1570f094663515273d0b4d27fc, postalCode=400032, street=HOME DEP.MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=a923979cf886d5724fbed87cd57745c3f72eba57b0d277f11e970f0aaca99802, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2019.01.19 15:04:02 +05'30'

**( द.ह.कदम )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
४. महालेखापाल ( लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई /नागपूर
५. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. परिवहन उप आयुक्त (प्रशासन/संगणक/लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९. वित्त विभाग (व्यय-८)मंत्रालय,मुंबई
१०.अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
११.निवडनस्ती (परि-४).